भाऊसाहेब फुंडकर फळबाग लावगड योजनेसाठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता निधी वितरीत करण्याबाबत..
(लेखाशिर्ष- २४०१ ए८९८)

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१८ / प्र.क्र.११ / कार्यासन.६
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : - ११ फेब्रुवारी, २०१९.

वाचा -

१)शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१८ /प्र.क्र.६९ / अर्थ-३, दि.०२.०४.२०१८ व दि.२५.०१.२०१९ .
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.पुरक-२०१८ /प्र.क्र.९५ / अर्थ-३, दि.२७.०७.२०१८
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.पुरक-२०१८ /प्र.क्र.१३५ / अर्थ-३, दि.५.१२.२०१८
४) कृषि व पदुम विभागाची नस्ती क्र. फुंफला-२०१८ / प्र. क्र.२३६ / ९-अे.

**शासन निर्णय-**

भाऊसाहेब फुंडकर फळबाग लावगड योजनेसाठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात अनुसूचित जमाती प्रवर्गाकरीता मागणी क्र. टी-५, २४०१, पिक संवर्धन, ७९६ जनजाती क्षेत्र उपयोजना, राज्य योजनांतर्गत योजना, (०१ (३६) भाऊसाहेब फुंडकर फळबाग लावगड योजना, लेखाशिर्ष (२४०१ ए८९८) या लेखाशिर्षांखाली रु. ४५०.०० लाख इतका निधी पुरक मागणीद्वारे नोव्हेंबर, २०१८ च्या विधानमंडळ अधिवेशनात अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. यानुषंगाने कृषी विभागाच्या संदर्भीत क्र.४ येथील प्रस्तावास अनुसरुन भाऊसाहेब फुंडकर फळबाग लावगड योजना, लेखाशिर्ष (२४०१ ए८९८) या लेखाशिर्षांखाली ८०% मर्यादेत रु.३६०.०० लाख ( **रुपये तीन कोटी,साठ लाख फक्त)** इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून सचिव (कृषी), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS ) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. नियंत्रण अधिकारी / विभागप्रमुख यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार सदर निधी याच वर्षात खर्च होईल याची दक्षता घ्यावी.तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास; आदिवासी विकास विभाग व कृषि व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत सूचना देण्यात यावी.

३. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील क्षेत्रात विविध योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी उपयोजना क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर लक्ष ठेवता येईल.

४. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतुन आदिवासी उपयोजना क्षेत्रात पायाभूत सविधा निर्माण करण्याबाबतच्या तसेच वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात आणि आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील क्षेत्रात फक्त वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाने **वाचा** येथील क्रमांक १ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३२६/२०१९/व्यय १, दि.५/०१/२०१९ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२०४१३३१४९७०२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ravindra Digambarrao Aute

Digitally signed by Ravindra Digambarrao Aute
DN: cn=Ravindra Digambarrao Aute, o=Tribal Development Department, ou=Government of Maharashtra, email=rajendra.aute@nic.in, c=IN
Date: 2019.02.11 17:39:40 +05'30'

रविंद्र दि.औटे
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव ( कृषि ) कृषि व पदुम विभाग,मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त( कृषि) , महाराष्ट्र राज्य,पुणे.
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
५. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
७. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
८. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९. कार्यासन क्र. २ व ९, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई